

# नभप्रभा

## उत्तर व दक्षिणेकडील प्रकाशाची कहाणी

रिचर्ड टी. पार, चित्र: एंड्रे लोथे

# नभप्रभा

## उत्तर व दक्षिणेकडील प्रकाशाची कहाणी

रिचर्ड टी. पार,  चित्र: एंड्रे लोथे

मराठी अनुवाद: अमिता नायगांवकर

Marathi translation of
Aurora : A Tale of the Northern and Southern Lights
By Richard T. Parr, Illustrated by Endre Lothe

# नभप्रभा

## उत्तर व दक्षिणेकडील प्रकाशाची कहाणी



रिचर्ड टी. पार,  चित्र: एंड्रे लोथे

अर्पण:

माझी बहीण जीन हिला

आणि अजूनही नाताळच्या जादूवर विश्वास ठेवणाऱ्या सर्वांना

# नभप्रभा

ऐकले आहे का कधी त्या विलक्षण पक्ष्याविषयी?
काळ्याभोर ध्रुवीय आकाशात करतो तो विहार?
आणि लांब सोनेरी केसांची सुंदर राजकन्या
सूर्योदयापर्यंत होते त्याच्या पाठीवरती स्वार?

ऐकले नाही का तुम्ही त्या स्वर्गीय पक्ष्याविषयी
पंख आहेत ज्याचे झगमगते तेजोमयी?
तेजस्वी नील हरित आणि लाल सोनेरी मुकुट घालुनी,
आणतो जो पहाट प्रदीर्घ ध्रुवीय रात्रीजवळी!

एकदा, मी खूप लहान असताना, नाताळच्या पूर्वसंध्येला मी घरातून पळून गेलो. मला असा शोध लागला होता की सांता क्लॉज वगैरे काही नसतो. मला सांगितले गेल्याप्रमाणे मी झोपी गेल्यावर सांता काही आला नाही आणि नाताळच्या झाडाखाली त्याने काही भेट ठेवली नाही. उलट, लोकांनीच भेटी विकत घेऊन एकमेकांना दिल्या. आणि नाताळ म्हणजे मला वाटले की खरे तर हेच होत असणार - भेटवस्तू विकत घ्यायच्या आणि द्यायच्या.

“सांता क्लॉज नसतो! सांता क्लॉज वगैरे काही नसतो!” त्या रात्री उबदार बिछान्यावर पडून मी मनाशी हे पुनःपुन्हा घोकले. माझ्या आईबाबांच्या शयनगृहातील कपाटात मला सापडलेल्या आणि त्यावर माझे नाव असलेल्या सगळ्या नाताळच्या भेटवस्तूंबद्दल पण मी विचार केला.

सांताने त्या भेटवस्तू आणल्या नव्हत्या- माझ्या आईवडिलांनी आणल्या होत्या! जेव्हा सगळ्यांनी आणलेल्या भेटी उघडल्यानंतर मी त्यांच्यासाठी काहीच कसे आणले नाही हे ते विचारतील तेव्हा मी काय सांगू? त्यामुळे मी घर सोडून पळून जाण्याचे ठरवले.

सगळेजण झोपी गेल्यावर मी माझे फरवाले बूट आणि जाकीट घालून माझ्या शयनगृहाच्या खिडकीतून पसार झालो. कडाक्याची थंडी होती आणि रात्रीच्या वेळी भराभर चालल्यामुळे माझ्या गोठलेल्या श्वासाचा पांढरा ढग झाल्यासारखा झाला. पायाखालच्या बर्फाचा एवढा आवाज होत होता की मला वाटले त्या आवाजाने नक्कीच माझे आईवडील जागे होऊन माझ्या मागे मागे येतील. डोक्यावर अंधाऱ्या आकाशात हळूहळू एक हिरवागार प्रकाश लांबवर पसरत चालला होता, बर्फाला उजळवून टाकणाऱ्या त्या प्रकाशामुळे आमच्या घरामागच्या त्या डोंगरावर चढून जाणे मला सोपे झाले. मला माहित होते की त्यांना सकाळी माझ्या पाऊलखुणा सापडतील. म्हणून मी रात्रभर चालून जंगलात लपण्याचे ठरवले म्हणजे ते मला शोधू शकणार नाहीत.



गुडघाभर बर्फातून वाट काढत डोंगर चढायला मला बराच वेळ लागला. डोंगरावर पोचण्याआधी माझे पाय जाम दुखू लागले आणि माझ्या फुफ्फुसांत थंडीने जळजळ होऊ लागली. मी बसलो आणि भोजवृक्षाखाली टेकून जरा श्वास घेतला. थंडीपासून बचाव करण्यासाठी मी जाकिटाची टोपी चेहऱ्यावर घट्ट ओढली आणि हाताला उब लागावी म्हणून ते खिशात खुपसले. नाताळच्या भेटवस्तू मिळणे आणि सांता खरा नसणे, माझे आईबाबा आणि सकाळी उठल्यावर मी गेल्याचे कळल्यावर त्यांना काय वाटेल असे सगळे विचार माझ्या मनात तरळले. मी नक्कीच झोपी गेलो असणार कारण मी ज्यावर बसलो होतो त्या बर्फासारखी पांढरीशुभ्र दाढी असणाऱ्या आणि माझ्या डोक्यावरच्या  चांदण्यांसारख्या चमकत्या डोळ्यांच्या एका म्हाताऱ्या माणसाने अचानक मला हलवून उठवले.

"तर आत्ता," मी जागा झाल्याचे पाहून गंभीर आवाजात तो म्हणाला, "या थंडीत तू बाहेर का बरं झोपला आहेस? तू तर आता सांता क्लॉजची वाट बघत घरी पलंगावर असायला हवास."

"सांता क्लॉज वगैरे काही नसतो," डोळे चोळत झोप आणि थंडी घालवत मी उत्तर दिले. "लोक एकमेकांसाठी भेटवस्तू विकत घेतात. आणि मग ते असं भासवतात की सांता क्लॉज आणि त्याच्या सांबराने त्या आणल्या आहेत."

"खरं आहे ते," माझ्याकडे पहात क्षणभर थांबून म्हातारा म्हणाला. "बरेचसे लोक भेटी विकत घेतात, पण त्यामुळे आपण  सांता क्लॉजवर विश्वास ठेवायचा नाही, असं आहे का? तू काय आणलंस सांग या वर्षी तुझ्या घरच्यांसाठी?"

"काहीच नाही," मी म्हणालो. "मला वाटलं सांता प्रत्येकाला काहीतरी भेटवस्तू आणणार होता. पण मग मला कळलं की तो काही खरा नसतो! म्हणून मी घरातून पळून जायचं ठरवलं म्हणजे मग मी काही आणलं नाही म्हणून ते मला चिडवणार नाहीत."

"बरं," माझ्या जवळच्या बर्फात बसत तो म्हणाला, "मला नाही वाटत ते असं काही करतील. पण आता तू पळून जायचं ठरवलंच आहेस, तर सुरुवात तर चांगली झाली आहे. तिकडे खाली दरीत एका घराच्या धुरांड्यातून धूर येताना दिसतोय ते तुझंच घर का रे?"

मी मान डोलावली. मला वाटले की आता हा मला घरी घेऊन जाणार आणि माझ्या पालकांना उठवून त्यांना सांगणार की मी पळून जाण्याचा प्रयत्न केला. त्याने माझ्याकडे पाहिले आणि मग आकाशाकडे पाहू लागला.

"समजा तुझ्याकडे सगळ्यांना द्यायला भेटवस्तू असत्या तर तू पळून गेला नसतास आणि त्यांना दुःखी केलं नसतंस, हो की नाही?"

"पण माझ्याकडे द्यायला भेटवस्तूच नाहीत," मी तक्रार केली. मी थकलो होतो आणि गारठलो होतो आणि मला कळत नव्हतं की काय करावं व कुठे जावं त्यामुळे मी रडू लागलो. त्या म्हाताऱ्या माणसाने माझ्या खांद्यावर हात ठेऊन मला दिलासा दिला.

"तू त्यांना देऊ शकशील अशी एक भेटवस्तू माझ्याजवळ आहे," तो अगदी स्नेहाने म्हणाला. "ते असं काहीतरी आहे जे ते आयुष्यभर आठवणीत जपून ठेवतील! आणि ते त्यांना कोणी दिलं हेसुद्धा ते कधीही विसरणार नाहीत!"

"खरंच?" ताठ बसत मी म्हणालो. "काय आहे ते?" माझ्या हातमोज्यांच्या मागच्या भागाने मी माझे अश्रू पुसले. मला उत्सुकता वाटली की कदाचित त्याच्या खिशात काहीतरी असेल. त्याचे जाकीट खूप मोठे होते, आणि त्याला मोठे, खोल खिसे असल्याचे मला दिसत होते.

"सगळ्याच नाताळच्या भेटवस्तू काही झाडाखाली सापडत नाहीत," तो मंद हसून, माझे मन वाचत असल्यासारखे म्हणाला. "आणि काही भेटवस्तू तर तुम्ही पाहू पण शकत नाही. एखाद्या गोष्टीसारख्या!"

"गोष्ट!" मी आश्चर्याने विचारले. "गोष्ट?"

"हो! आणि ती ऐकल्यानंतर, उद्या सकाळी त्यांनी त्यांच्या भेटवस्तू उघडल्यावर तू ती गोष्ट प्रत्येकाला सांगू शकशील. आणि तीच तुझी त्यांना दिलेली नाताळची भेटवस्तू असेल! किती छान ना?"

"ती गोष्ट खरंच इतकी छान आहे?" मी विचारले कारण मला जरा भीती वाटली की जर ती चांगली नसेल तर ते मला हसतील किंवा माझी चेष्टा करतील.

"हो ती मस्त गोष्ट आहे," तो म्हणाला. "मी माझ्या आयुष्यात इतक्या गोष्टी ऐकल्या आहेत, पण या गोष्टीसारखी एकही नाही! ती खूप खूप पूर्वी घडलेल्या एका घटनेविषयी आहे. मी अजूनपर्यंत ती कोणालाही सांगितलेली नाही. चांगल्या गोष्टी सापडणे फार अवघड असते, आणि खरं तर चांगल्या गोष्टी या एक प्रकारच्या उत्तम भेटवस्तू असतात ज्या तुम्ही भेट देऊ शकता! आणि त्या कायम टिकतात!"

"मला सांगा ना ती गोष्ट!" मी घाईने म्हणालो. मी किती गारठलो आणि थकलो होतो ते मी विसरूनच गेलो. "मला ती गोष्ट सांगा ना म्हणजे उद्या सकाळी मी सगळ्यांना आश्चर्याचा धक्का देऊ शकेन!" माझे अंग कापू लागले आणि तो कधी सुरुवात करेल याची वाट पाहत आनंदाने मी माझे हात एकमेकांवर चोळले.

त्याने आपल्या जाकिटाच्या घड्यांमधून माझ्याकडे पाहिले आणि दाढीला कुरवाळले. मग त्याने वर आकाशाकडे पहिले आणि हळूच शिट्टी वाजवली. हळूहळू वर जाणारा हिरव्या रंगाचा लांब आणि धुरकट पट्टा अचानक लालपिवळ्या रंगाचा ज्वलंत पडदा होऊन झगमगला आणि त्याने अवघे आकाश व्यापून टाकले! प्रकाशाची किरणे झळाळत डोंगरमाथ्याच्या कडेने नृत्य करत राहिली आणि दरीमध्ये खालीवर लुकलुकत राहिली. असे वाटत होते की जंगलाला आणि डोंगराला आगच लागली आहे! मी माझ्या आयुष्यात एवढे सुंदर दृश्य कधीच पाहिले नव्हते! मला हवेत सळसळ झाल्यासारखा आवाज आला, जसे माझ्या डोक्यावरून काही उडत असावे असा, पण तो प्रकाश एवढा तेजस्वी होता की मी केवळ तो लखलखणारा आविष्कारच पाहू शकलो!

"तू जो प्रकाश पाहतो आहेस त्याची आणि त्या लांबलचक ध्रुवीय रात्रीची ही गोष्ट आहे," तो हसत म्हणाला. मग खाली झुकून त्याने माझे हात हातात घेतले. "नीट ऐक, कारण ही मी तुला देत असलेली भेट आहे! त्यातला एक शब्ददेखील तू विसरता कामा नये किंवा खरंच असं झालं असेल का अशी शंका घेता कामा नये! तू जगशील तितका काळ ती तुला आठवेल, आणि जेव्हा तुला नाताळला भेट द्यायला काही नसेल तेव्हा तू ती इतरांना सांगू शकशील!"

मी मान डोलावली आणि त्याचा हात घट्ट दाबून आवळला. त्याने क्षितिजावर झळाळणाऱ्या हिमशिखरांकडे बोट दाखवले आणि सुरुवात केली:

*******

दूर, दूर उत्तरेकडे लांब बोरेलिस नावाची जागा आहे. ती उत्तरेकडे इतकी लांब आहे की तिकडे जाण्यासाठी तुम्हाला प्रथम उत्तर ध्रुवाला जाऊन आणि मग ध्रुवीय समुद्रावरून चालत जाऊन जोपर्यंत वारा तुम्हाला पाठमोरा होत नाही तोपर्यंत पलीकडे जावे लागते! शेवटी जेव्हा तुम्ही जिथून वाऱ्याचा जन्म होतो अशा जागी येता, ती जागा म्हणजे बोरेलिस, उत्तरेकडील वाऱ्याचे घर. ते इतके उत्तरेकडे आहे की हिवाळ्यात तिथे सूर्य सहा महिने उगवत नाही आणि कायम अंधार असतो. आणि उन्हाळ्यात, शेवटी जेव्हा सूर्य परततो, तेव्हा तो मावळतच नाही, आणि पुढचे सहा महिने तिथे दिवसासारखा प्रखर उजेड असतो.

बोरियस राजा आणि त्याचे कुटुंब, हिमराज्ञी आणि त्यांची मुलगी, अरोरा, या दुर्गम प्रदेशावर राज्य करतात. ते ध्रुवीय समुद्रकिनाऱ्यावर, प्रत्येक खोलीत स्फटिकाच्या खिडक्या आणि बर्फाचे झुंबर असलेल्या सुंदर पांढऱ्याशुभ्र महालात राहतात. त्या महालाच्या मध्यभागी एक निळ्या बर्फातून कापलेली बॉलरूम फरशी आहे आणि गोठलेल्या पांढऱ्या दवाने आच्छादलेले अंगण आहे! हिवाळ्यात, शिंपल्यामध्ये रोवलेल्या उंच मेणबत्त्या प्रत्येक खिडकीमधून चमकतात, आणि चमचमणाऱ्या बर्फापलीकडे जिथपर्यंत तुमची नजर पोचेल तिथपर्यंत तो महाल एखाद्या हिऱ्यासारखा लखलखतो! आणि उन्हाळ्यात, जेव्हा स्फटिकाच्या खिडक्यांमधून सूर्य प्रकाशमान होतो आणि बॉलरूमच्या फरशीवर पसरतो, तेव्हा तो महाल इंद्रधनुष्याच्या सगळ्या रंगांनी झळाळून जातो!

एका रात्री, सूर्य अस्ताला गेल्यानंतर खूप वेळाने, बोरियस राजाला त्याची मुलगी अरोरा तिच्या शयनगृहाच्या बाल्कनीत उभी राहिलेली दिसली. तिच्या डोळ्यात अश्रू होते आणि ती काळोख्या चांदण्या रात्रीकडे एकटक बघत होती.

"काय झालं?" राजा म्हणाला. "काय झालं बाळा सांग मला!"

"केवढी ही रात्र!" अरोरा रडू लागली. किती काळ झाला अंधारच आहे, आणि नुसत्या चांदण्या बघून मला कंटाळा आलाय! तुम्ही त्या सूर्याला लवकर परत आणा ना म्हणजे पक्षी परत येतील आणि मी बोटीवरून सैर करू शकेन आणि शिंपले गोळा करत किनाऱ्यावरून चालू शकेन."

आता बोरियस राजा खरे तर खूप शक्तिशाली राजा आहे, कारण तोच तर उत्तरेच्या वाऱ्यावर नियंत्रण ठेवतो आणि त्याची बायको, हिमराज्ञी तर बर्फ तयार करते. ते दोघे मिळून, लांबलचक गोठवणाऱ्या थंडीमध्ये जमिनीवर बर्फाचे आच्छादन घालणारे तुफानी वादळ तयार करतात. पण दोघांपैकी एकालाही जराही कल्पना नव्हती की निर्धारित वेळेच्या आधी सूर्याला कसे बरे परत यायला लावायचे. त्यामुळे राजाने त्याच्या सगळ्या सल्लागारांना समोर बोलावले आणि विचारले की काय करता येऊ शकेल ज्यामुळे सूर्य परत येईल आणि त्याची मुलगी पुन्हा आनंदित होईल. कारण जर अरोरा दुःखी असेल तर बोरियस राजा आणि हिमराज्ञी पण दुःखी असणार, आणि जेव्हा बोरियस राजा आणि हिमराज्ञी दुःखी असतील, तेव्हा त्यांच्या राज्यातील प्रत्येकजण दुःखी असणार!

राजाच्या सगळ्या केस पिकलेल्या, कंबरेत वाकलेल्या पण ज्ञानी सल्लागारांनी त्यांची शुभ्र लांबलचक वैचारिक पगडी घातली आणि ते राजाच्या स्फटिकाच्या टेबलवर बसले. त्यांनी खूप विचार केला आणि रात्रभर (आठवतंय ना सहा महिन्यांची रात्र असते तिथे) प्रदीर्घ चर्चा केली. पण राजाने दिलेले जवळजवळ सगळे आईसक्रीम खाल्ल्यावर आणि सगळी बर्फाची वाईन प्यायल्यानंतर, सूर्याला परत कसे आणायचे हे कोणीही राजाला किंवा हिमराज्ञीला सांगू शकले नाही.

मग राजाने ओरडून बर्फातल्या महान घुबडाला विचारले की सूर्याला कसे परत आणायचे? त्याला आकाशात घडणाऱ्या सगळ्या घटना माहित होत्या.



घुबडाने त्याचे मोठाले पांढरे पंख पसरले आणि फांदीवरून खाली राजाच्या टेबलाभोवती बसलेल्या सगळ्या सल्लागारांकडे त्याने पाहिले.

"कोण? कोणाला? कोणाला माहित आहे सूर्याला कसं परत आणायचं ते? मला खरंच असं वाटत नाही की ते जमेल!"

मग निराश झालेल्या राजाने बर्फातल्या शक्तिशाली अस्वलाला विचारले ज्याला जमिनीवर घडणारी प्रत्येक गोष्ट माहित होती. अस्वल त्याच्या मागच्या पायांवर उभे राहिले, बॉलरूममध्ये सभोवताली पाहिले आणि तीन वेळा गर्जना केली. शेवटच्या वेळी एवढ्या जोरात ओरडले की स्फटिकाच्या खिडक्या फुटल्या, टेबलाला चिरा गेल्या आणि सल्लागार त्यांच्या खुर्चीत थरथर कापू लागले.



"सूर्याला परत आणायचे? चुकीचा विचार करताय तुम्ही!"

हे ऐकून राजा अगदी हताश झाला आणि त्याने युनिकॉर्न व्हेलला विचारले ज्याला समुद्राखाली घडणारी प्रत्येक गोष्ट माहित होती.

व्हेलने आपल्या लांब दातासारख्या शिंगाला पुढच्या पायांनी एक फटकारा मारला आणि बराच वेळ गंभीरपणे विचार करत बसला.

"निर्धारित वेळेआधी सूर्याला उगवायला लावायचं? हे कशासाठी करायचं मला काही समजत नाही!"



राजाने टेबलासभोवतीच्या त्याच्या सल्लागारांकडे पाहिले आणि हतबल होऊन रडू लागला. "तुमच्यामध्ये एक जण सुद्धा असा नाही की जो मला सांगू शकेल रात्रीला कसं पळवून लावायचं आणि माझ्या मुलीला पुन्हा कसं आनंदित करायचं!"

हे ऐकून सगळे चिडीचूप शांत झाले, त्यात बर्फातले अस्वल सुद्धा होते. त्यांना इतके लाजिरवाणे वाटत होते की ते राजाच्या डोळ्याला डोळा लावू शकत नव्हते. अखेरीस एक बर्फासारखी पांढरीशुभ्र दाढी असलेला एक म्हातारा बोलला. इतका वेळ आपल्याआपल्यात वादविवाद करणाऱ्या सल्लागारांचे बोलणे तो काहीही न बोलता ऐकत होता.

"प्रिय राजा आणि राणी," तो म्हणाला, "मी माझ्या आयुष्यात जगभर फिरलो, खूप अद्भुत गोष्टी पाहिल्या. मी छोटा मुलगा होतो तेव्हा असेच एकदा दक्षिणेकडे गेलो असताना, समुद्रात लांब सफर करायला गेलो आणि शेवटी एका महाकाय नदीच्या तोंडाशी येऊन पोहोचलो. आम्ही नदीतून पुढे पुढे जात राहिलो आणि शेवटी किनाऱ्याला लागून असलेल्या एका सुरेख पांढऱ्याशुभ्र शहरापाशी आलो. त्या शहराचे नाव होते हेलियोपोलीस, म्हणजे सूर्यनगरी. त्या नगरात मला खूप अजब आणि विचित्र गोष्टी पहायला मिळाल्या. पण त्या सगळ्यात अजब गोष्ट म्हणजे तिथल्या खलिफाच्या अंगणात असलेला सोन्याच्या पिंजऱ्यातला पक्षी! त्यांनी त्याला फीनिक्स किंवा अग्निपक्षी असं नाव दिलं होतं. तो दोन माणसांच्या उंचीएवढा होता, डोके हिरवे होते आणि त्याचा सोनेरी तुरा सूर्यकिरणांप्रमाणे चमकत होता! त्याचे पंख माणकासारखे लाल होते आणि त्याच्या लांब निळ्या शेपटीवर सोनेरी ठिपके होते! जेव्हा त्याने त्याची चोच उघडली तेव्हा त्याचा गळा पाचूच्या प्रकाशात धरल्यासारखा दिसला! मी तिथे बराच वेळ त्याला न्याहाळत उभा राहिलो. नंतर शेवटी तो वळला आणि त्याने माझ्याकडे पाहिले. त्याचे डोळे दोन मोठ्या आणि सुंदर नीलम मण्यांसारखे चमकताना पाहून मी निःशब्द झालो! लोक म्हणतात की जेव्हा तो पक्षी त्याचे पंख पसरतो तेव्हा ते सूर्यासारखे प्रकाशमान होतात, आणि तुमचे डोळे दिपून जातात! आता सूर्याला कसं परत आणायचं हे आपल्यापैकी कोणालाही जर माहित नाही तर मग कदाचित जर राजकुमारीकडे हा अद्भुत पक्षी असेल तर मोठाल्या हिवाळयातल्या रात्रीत त्याच्याकडे पाहून कदाचित ती खुश होईल!"

म्हातारा माणूस जे म्हणाला त्यावर विचार करत राजाने दाढी कुरवाळली. निर्धारित वेळेआधी सूर्याला कसे आणायचे हे कोणालाच माहिती नसल्याने, आता त्याच्या मुलीला आनंदित करण्यासाठी तो अग्निपक्षी ही एकमेव आशा उरली होती.

"ह्या पक्ष्याच्या बदल्यात खलिफाला, या शहराच्या शासकाला, मला काय द्यावे लागेल?" त्याने त्या म्हाताऱ्या माणसाला विचारले. सूर्याला परत आणण्याचा निष्फळ प्रयत्न केल्याचे प्रायश्चित्त घ्या असे राजा त्याच्या सल्लागारांना सांगणार एवढ्यात, म्हातारा ओरडला, "सोने, राजर्षी! तुमच्याकडे पुरेसे सोने असेल तर त्याने काहीही विकत घेता येईल!"

"माझ्याकडे चिकार सोने आहे!" राजा म्हणाला. बोरेलिसमधले पर्वत सोन्याने भरलेले आहेत! पहिल्या पहाटे प्रवासाला निघण्यासाठी एक जहाज व खलाशी तयार करा! मी उत्तरेकडच्या वाऱ्याला जहाजाच्या शिडामध्ये हवा पूर्ण भरलेली ठेवण्याची आज्ञा देईन!"

आणि, अखेरीस जेव्हा दीर्घ हिवाळी रात्र संपली आणि क्षितिजावर जरा फटफटले, तेव्हा राजा आणि त्याचा ताफा, बर्फातील एका कालव्यामधून दक्षिणेकडे समुद्रातील हेलियोपोलिस या भागाकडे रवाना झाले. बऱ्याच आठवड्यांनंतर, चांगली हवा आणि जहाजाच्या शिडाची मदत घेत शेवटी ते पूर्वेला त्या म्हाताऱ्याने उल्लेख केलेल्या समुद्राकडे पोचले. दिवसेंदिवस खूप वेगाने उष्णता वाढत होती, आणि अजून काही आठवडे नौकानयन केल्यानंतर अखेरीस ते समुद्रात जाऊन मिळणाऱ्या शक्तिशाली नदीच्या मुखाशी आले. आणि त्यानंतर प्रवास करत ते हेलियोपोलिसला, सूर्यनगरीला येऊन पोचले. किनारे कसले चमकत होते तिचे! बंदरात नांगर टाकल्यानंतर राजा आपला ताफा घेऊन खलिफाच्या अंगणापर्यंत येऊन पोचला. आणि तिथल्या डेरेदार सुगंधी वृक्षाखाली एका सोनेरी पिंजऱ्यात तो दिमाखदार अग्निपक्षी होता, अगदी त्या म्हाताऱ्या माणसाने वर्णन केला होता तसाच!

"हा पक्षी खरंच अमूल्य आहे!" त्या पक्षाकडे पहात राजा पुटपुटला. खलिफाला तो पक्षी आपल्याला द्यावासा वाटेल का नाही या विचाराने त्याच्या हृदयात कालवाकालव झाली. "मी त्याला खलिफापासून कसा बरं लांब नेऊ शकेन?"

दूरच्या प्रदेशातून काही अनोळखी लोक आल्याचे आणि त्याच्या पक्षाकडे पाहत असल्याचे ऐकून लगोलग खलिफा त्याच्या राजवाड्यातून त्यांचा ठावठिकाणा विचारायला आणि त्यांचे आदरातिथ्य करायला आला.

"आम्ही बोरेलिस या देशातून आलो आहोत, जिथे उत्तरेकडील वाऱ्याचे घर आहे तिकडून," राजा म्हणाला. "आम्ही तुमचा अद्भुत अग्निपक्षी आणि त्याने त्याचे पंख पसरल्यावर दिसणारा तेजोमय नजारा बघण्यास आलेलो आहोत."

"हाच तो अग्निपक्षी जो तुम्ही पहात आहात," प्रसन्न मुद्रेने खलिफा म्हणाला. "पण जेव्हा त्याने त्याचे पंख पसरून तेजोमय नजारा दाखवण्याची गोष्ट येते, तर अशी वदंता आहे की तो आगीमध्ये जन्माला आला आणि दर पाचशे वर्षांनी कसा तो स्वतःच्या राखेतून पुन्हा नव्याने उभारी घेतो तर...अरेरे! ते मी तुम्हाला नाही सांगू शकत. माझा जन्मदेखील झाला नव्हता तेव्हापासून हा पक्षी या पिंजऱ्यात बंद आहे. आणि तेव्हापासून आत्तापर्यंत त्याने त्याचे पंख फडफडवले नाहीत, एकदाही नाहीत."

"अग्निपक्ष्याच्या बाबतीतील आख्यायिका खऱ्या आहेत की नाहीत हे आम्हालाही माहित नाही, " राजा म्हणाला, "आम्ही प्रवास करत इकडे आलो ते हे पाहण्यासाठी की तुम्ही तो आम्हाला देऊ शकाल का, म्हणजे माझी मुलगी अरोरा, हिवाळ्याच्या मोठाल्या रात्रीत त्याच्याकडे पाहून प्रफुल्लित होईल."

"अग्निपक्षी देऊन टाकायचा!" खलिफा आवाज वाढवत ओरडला. "तो अमूल्य आहे! त्याच्यासारखा तोच! त्याच्यासारखा कोणीच नाही!" पण, आलेला राजा आणि त्याचा ताफा हे त्याचे आमंत्रित पाहुणे आहेत हे आठवून, अचानक त्याचे वागणे बदलले, आणि पुन्हा तो आदबशीर आणि मैत्रीपूर्ण झाला. बोरियस राजा काय देऊ शकेल याची उत्सुकता वाटून (खरे तर, सत्य हे होते की काहीही झाले तरी त्याचा पक्षी विकायचा इरादा नव्हता!), खलिफाने त्याचे हात जोडले आणि पिंजऱ्याकडे नजर टाकली. "या पक्ष्यासाठी तुम्ही काय द्यायला तयार आहात?" त्याने खुश होऊन विचारले.

राजाने त्याच्या ताफ्यातील दोघांकडे पाहून इशारा केला, त्यांनी त्यांच्या मधे जमिनीवर पडलेली कातड्याची मोठी पोती उचलली आणि खलिफाच्या जवळ आणून त्याच्या पायाशी ठेवली.

"तुम्हाला हवे तितके सोने," पोत्यांकडे नजर टाकत गंभीरपणे राजा म्हणाला. "माझी मुलगी आनंदित होणार असेल तर इतके सोने माझ्यासाठी काही फार मोठी गोष्ट नाही!"

खलिफाने त्याच्या पायाशी पडलेल्या सोन्याच्या जड पोत्यांकडे पाहिले. "अरे देवा," डोके हलवत आणि हाताने तोंडावर वारा घालत तो म्हणाला, कारण तळपत्या उन्हात उघड्या अंगणात उभे राहून त्याला अस्वस्थ वाटू लागले होते. "तीन जन्मांत खर्चू शकणार नाही इतके सोने माझ्याजवळ आहे. आणखी सोन्याचे मी काय करू?"

हे ऐकून राजाचे हृदय विदीर्ण झाले. त्याने त्याची दाढी कुरवाळली आणि खलिफाला दुसरे काही काय हवे असेल याचा खूप विचार केला. अचानक त्याचे डोळे चमकले! त्याने हात वर करून त्याचा मुकुट काढला आणि खलिफाला दिला.

"माझा मुकुट!" राजा म्हणाला. "माझा मुकुट घ्या! यात पृथ्वीवरील सर्वात मौल्यवान दागिने आहेत- बोरेलिसच्या पर्वतावरील हिरे आहेत! ते अंधारातसुद्धा चमकतात!"

"अरे देवा!" पिंजऱ्यातील अग्निपक्ष्याकडे पहात आणि कपाळावरचा घाम पुसत खलिफा पुन्हा ओरडला, कारण आता खरोखरच त्याला गरम व्हायला लागले होते. "तीन जन्मांत मी घालू शकणार नाही एवढे दागिने माझ्याकडे आहेत. अजून घेऊन मी काय करू?"

हे ऐकून निराशेने बोरियस राजाचे हृदय पिळवटले. रिकाम्या हाताने त्याच्या मुलीकडे परतण्याचा विचार त्याला सहन होईना. त्याने वैतागाने त्याच्या दाढीचे केस ओढले आणि त्या पक्ष्याच्या बदल्यात तो काय देऊ शकेल याचा तातडीने विचार करू लागला. तळपत्या उन्हात उभे राहिल्याने खलीफाला खूप घाम आला होता आणि उन्हापासून बचाव करण्यासाठी त्या सुगंधी वृक्षाच्या सावलीकडे नजर लावून बसला होता. खलिफाला झाडाकडे पाहताना बघून राजाला अचानक एकदम हसू आले.

"कदाचित," तो प्रसन्न मुद्रेने म्हणाला, "माझ्या वाऱ्याचा एक तुकडा दिला तर त्याबदल्यात तू मला पक्षी देशील."

"कशाचा तुकडा?" खलिफा त्याच्याकडे वळून म्हणाला. "तुला काय म्हणायचे आहे.. ?"

पण तो अजून काही म्हणायच्या आतच, बोरियस राजाने आपला हात हलवला आणि लगेचच अंगणात थंड हवेची झुळूक पसरली. त्या वाऱ्याने सुगंधी झाडाची पाने सळसळू लागली आणि त्यामुळे खलिफाच्या तोंडावरील घाम सुकून गेला. खलिफाने आश्चर्य वाटून राजाकडे पाहिले.

"तुम्ही जिथे जाल तिथे हा वारा तुमच्या मागे येईल," राजाने समजावले, "आणि तुम्ही जिवंत आहात तोवर तुम्हाला आणि तुमच्या राजवाड्याला थंडगार ठेवेल."

"खरंच हा प्रस्ताव तर अमूल्य आहे!" खलिफा ओरडला. आपले बाहू पसरून गोल गिरकी घेत, अंगावर येणाऱ्या थंड वाऱ्याची झुळूक अनुभवत म्हणाला, "अग्निपक्षी आता तुमचा आहे!"

तर मग, खलिफाच्या उदार आदरातिथ्याचा आणि हेलियोपोलिसच्या अद्भुत जगाचा आनंद घेतल्यावर, राजा आणि त्याचा ताफा अग्निपक्षाबरोबर पुन्हा बोरेलिसला रवाना झाले. राजाच्या आज्ञेनुसार, वारा जहाजाच्या शिडामध्ये दिवसरात्र हवा भरत राहिला. परंतु, ते ध्रुवीय समुद्राच्या टोकापर्यंत पोचेपर्यंत उन्हाळा संपत आला होता आणि दिवस लहान होऊ लागले होते. समुद्रात त्यांच्याभोवती हिमखंड तयार होऊ लागले होते आणि जसजसे ते उत्तरेकडे लांब लांब जाऊ लागले तसतसा त्यांच्या जहाजाभोवती आणि डेकवर बर्फ जमा होऊ लागला. मोठ्या मुश्किलीने त्यांनी मुक्त चॅनेल पार केले आणि लगेचच त्यांच्यामागे काहीतरी जोरदार आदळल्याचा आवाज होऊन बर्फाने ते चॅनेल बंद झाले! ते राजाच्या महालापर्यंत पोचेपर्यंत हिवाळ्याची दीर्घ रात्र सुरु झाली होती!



डेकवरच्या पिंजऱ्यातील बहारदार अग्निपक्षी पाहून अरोराने तिच्या वडिलांना मिठी मारली आणि ती आनंदाने नाचली. लगेचच पिंजरा अंगणात आणला गेला म्हणजे तिच्या शयनगृहाच्या बाल्कनीतील खिडकीतून ती तो पक्षी पाहू शकेल.

"आहा, किती सुंदर आहे हा पक्षी!" आनंदाने टाळ्या वाजवत ती उद्गारली, "किती वाट पाहायची या पक्ष्याने त्याचे चंदेरी पंख पसरण्याची आणि त्याचा सुंदर नजारा दाखवण्याची!"

पण अरोरा आणि बाकीचे लोक मात्र व्यर्थपणे वाट पहात बसले कारण अग्निपक्षी त्याच्या फांदीवरून खाली पण आला नाही किंवा अंगावरचे एखादे पीस सुद्धा हलवले नाही. त्याने नवीन जागेमध्ये किंवा त्याला बघायला येणाऱ्या लोकांमध्ये अजिबात रस दाखवला नाही. अरोरा आधी नाराज झाली आणि मग तिला काळजी वाटू लागली. झोपी जाण्याआधी ती नेहमी तिच्या बाल्कनीतून त्याच्याशी बोलायची, पण तो पक्षी एकदाही तिच्याकडे बघत नव्हता. एकदा, राजवाड्यातले सगळे लोक झोपी गेल्यावर, ती पिंजऱ्यापाशी उभी राहिली आणि तिच्या सुंदर, मधुर आवाजात हळुवारपणे एक गाणे म्हणले:

ज्वालेतून जन्मणाऱ्या हे सौंदर्यपक्ष्या,

पूर्ण कर माझी मनोकामना!

पसर तुझे प्रज्वलित पंख

आणि कर माझ्यासाठी आजच्या रात्रीची पहाट!

अग्निपक्ष्याने हळूच आपले तुरेवाले डोके वळवले आणि पिंजऱ्याच्या तारांमधून तिच्याकडे पाहिले. त्याच्या मोठ्या मोठ्या निळ्या डोळ्यांच्या कोपऱ्यातून एक सोनेरी अश्रू गळला, त्याचा बर्फ होऊन तो टपकन पिंजऱ्याच्या तळाशी पडला. अरोराने ते पाहिले तेव्हा ती इतकी अस्वस्थ झाली की तिने तिच्या वडिलांना उठवले, आणि त्यांनी ताबडतोक राजवैद्याला बोलावले. राजवैद्याने पिंजऱ्याच्या तारांमधून हात घालून अग्निपक्ष्याची छाती तपासली, त्याची झुकलेली शेपूट, विस्कटलेली पिसे आणि मलूल डोळे पाहिले.

"सांगा बरं?" राजाने अधीर होऊन विचारले. "काय झाले आहे?"

"तो मृत्युपंथाला लागला आहे," राजवैद्य म्हणाले. " इतका काळ तो दक्षिणेकडे कैदेत आहे, मग इथपर्यंतचा प्रवास, सततचा काळोख... त्याची जगण्याची इच्छाच गेली आहे. मला नाही वाटत की तो सकाळपर्यंत जिवंत राहील."

"बाबा!" अरोरा रडू लागली. "जर तो मरत असेल, तर त्याला त्याच्या आवडीच्या ठिकाणी जाऊन मरू देत! त्याला मुक्त करा! कृपया त्याला स्वतंत्रपणे उडू दे!"

राजाने तशी आज्ञा दिली, आणि काही मिनिटांतच पिंजऱ्याचे छत आणि खिडक्या मोकळ्या केल्या गेल्या. त्यानंतर पक्षी काय करेल हे पाहण्यासाठी सर्वजण थोडे मागे सरकले.

राजवाड्यात आल्यापासून पहिल्यांदाच, अग्निपक्षी सभोवताली पाहू लागला. त्याने त्याचे सोनेरी तुरा असलेले डोके मागे पुढे वळवले आणि त्याचे नीलमण्यासारखे डोळे दूरवर चांदण्यांत चमकणाऱ्या हिमशिखरांवर रोखले. त्याने आपले डोके मागे झुकवले आणि तो ताऱ्यांकडे पाहू लागला आणि नंतर, डोळ्याचे पाते लवते न लवते तोच, त्याने त्याचे शक्तिशाली पंख पसरले! सूर्यालाही लाजवेल अशा तेजाने त्याने रात्रीच्या आकाशात झेप घेतली!

ते स्वर्गीय दृश्य पाहून सगळेजण अवाक झाले, आणि आपला प्रिय पक्षी आकाशात उंच उडताना पाहून अरोराच्या डोळ्यात आनंदाश्रू आले. त्याच्या पंखांमधून इंद्रधनुषी रंगांचे झगमगते वादळ बरसत होते. त्याचा प्रकाश झळाळून उठत पर्वतशिखरांवर नृत्य करत होता आणि गोठलेल्या समुद्रावरून परावर्तित होत होता. जणू काही बर्फ पेटला आहे आणि पहाट पुन्हा परत आली आहे! जसजसा अग्निपक्षी उंच उंच उडत गेला, तसतसा त्याचा प्रज्वलित देखावा फिकट फिकट होत गेला. अगदी शेवटी तो जिथून गेला तिथे त्यांना रात्रीच्या अवकाशात क्षितिजापर्यंत फक्त एक फिक्या हिरव्या प्रकाशाचा पट्टा दिसला. तो देखील हळूहळू नाहीसा झाला.

"अग्निपक्षी उडाला," बोरियस राजा अरोराच्या खांद्यांभोवती हात टाकून तिला दिलासा देत शांतपणे म्हणाला. "बहुतेक हेच उत्तम झाले. तो इतका सुंदर होता की या सोनेरी पिंजऱ्यात तो त्याचे उर्वरित आयुष्य काढू शकला नसता."

पण अरोरा मात्र तिचा पक्षी गमावल्यामुळे दुखावली होती. बोरियस राजा आणि राजवाड्यातील इतर सर्वजण झोपी गेल्यावर बऱ्याच वेळाने ती तिच्या बाल्कनीत रात्रीचे आकाश निरखत उभी राहिली. कदाचित ती आपला प्रिय अग्निपक्षी परत आणणाऱ्या तेजस्वी पहाटेची वाट पाहत होती. पण रात्र मात्र काळीकुट्ट राहिली, तिने आत्तापर्यंत पाहिलेल्या रात्रीपेक्षाही काळीशार. आणि तारे बर्फाच्या ज्वालेप्रमाणे लटकत त्यांचा थंड भावनाशून्य मिणमिणता प्रकाश

तिच्यावर टाकत होते. शेवटी ती झोपी गेली आणि झोपेतच मुसमुसत राहिली, स्वतःला वचन देत राहिली की सकाळी उठल्यावर ती तिच्या लाडक्या अग्निपक्ष्याला तो जिथे कुठे उडून गेला असेल तिथून शोधून काढेल. अगदी तिला पृथ्वीच्या दुसऱ्या टोकाला जावे लागले तरी चालेल.

तिला झोप लागल्यानंतर थोड्या वेळाने, पंख फडफडवत येणाऱ्या वादळाने आणि शयनगृहातील डोळे दिपवून टाकणाऱ्या प्रकाशझोताने तिला जागे केले. उठून बसत तिने पाहिले तर तिच्या ओसरीवर अग्निपक्षी बसला होता, खिडकीतून तो तिला न्याहाळत होता, त्याचे निळे डोळे ज्वालेसारखे चमकत होते! आनंदाने ओरडत तिने आपल्या वडिलांना आणि राजवाड्यातील इतरांना उठवले, ती बाहेर गेली आणि अग्निपक्ष्याच्या गळयाला आलिंगन दिले!

"बाबा बाबा!" ती ओरडली. तो परत आलाय! तो परत आलाय! मी त्याला पुन्हा माझ्या नजरेआड होऊ देणार नाही! कधीच नाही! कधीच नाही!"

आणि अशाप्रकारे जेव्हा जेव्हा अग्निपक्षी उडायचा, तेव्हा तेव्हा अरोरा तिच्या बाल्कनीत उभी राहून रात्रीच्या आकाशात पक्ष्याच्या पंखांमधून सुंदर इंद्रधनुषी रंगांच्या प्रकाशाचा पडदा सळसळताना, झगमगताना पाहायची. शेवटी तो पुन्हा परत येऊन बाल्कनीत तिच्या शेजारी येऊन उतरेपर्यंत, तो तिच्या डोक्यावर कसा मागे पुढे उडतो त्याचा वेध घेत बसायची. तिची त्याच्याशी एवढी जवळीक झाली की तिची झोप अजूनच कमी झाली. तिला भीती वाटायची की तो कदाचित तो परत येणार नाही, कदाचित तो पूर्वी गेला तसा क्षितिजापल्याड उडून जाईल, आणि त्या थंड, नीरस रात्रीच्या आकाशाकडे बघणाऱ्या तिला बाल्कनीत एकटे सोडून जाईल.

तिची भीती एकदा एवढी वाढली की, जेव्हा उडण्यासाठी पक्ष्याने पंख पसरले, तेव्हा तिने त्याच्या पाठीवरच उडी मारली आणि त्याच्या सोनेरी मानेभोवती आपले हात टाकले! अरोरा त्याच्या पाठीवर चिकटून बसलेली असतानाच अग्निपक्षी हवेत झेपावला आणि राजवाड्यावरून पुढे जात, त्याच्या चमकणाऱ्या पंखांनी पर्वतशिखरांवरून एक गोल चक्कर मारून आला! क्षितिजाच्या एका टोकापासून दुसऱ्या टोकापर्यंत लालपिवळ्या ज्वालांचे पडदे झिरमिळत असताना, बर्फाळ उतारांवरून खालीवर झगमगणाऱ्या हिरव्या ज्वाळांनी पर्वत प्रज्वलित झाले होते! कोणीही कधीही असा स्वर्गीय आविष्कार पहिला नव्हता! पर्वतशिखरांवरील व आकाशातील प्रकाशनृत्य आणि त्याचे प्रभामंडळ पाहून ते चकित झाले होते! आणि अखेरीस जेव्हा ते जमिनीवर आले तेव्हा अगदी बोरियस राजा आणि हिमराज्ञीदेखील, अग्निपक्ष्यावर स्वार झाल्याबद्दल त्यांच्या मुलीला ओरडू शकले नाहीत!

आणि तेव्हापासून, अरोरा आणि अग्निपक्षी या दोघांची जोडीच जमली! ती त्याच्या पाठीवर बसली तरच तो उडू लागला. इतर वेळी तो बाल्कनीच्या कठड्यावर बसून, तिच्या शयनगृहाच्या खिडकीतून त्याच्या निळ्या निळ्या डोळ्यांतून तिची वाट बघत बसे. म्हणजे ती बाहेर येईल आणि ते अंधाऱ्या ध्रुवीय आकाशातून उडून जातील.

आणि शेवटी एकदाची, हिवाळ्यातली मोठी रात्र संपली आणि मध्यरात्री उगवणारा सूर्य प्रथमच क्षितिजावर आला. अरोरा तिच्या बाल्कनीतून बाहेर आली आणि पाहिले तर तिचा लाडका अग्निपक्षी उदास दिसत होता आणि त्याचे डोळे निस्तेज दिसत होते. अरोराने लगेच आपल्या वडिलांना सांगितले. त्यांनी राजवैद्यांना बोलावणे धाडले. राजवैद्यांनी पक्ष्याला नीट तपासले, त्याचे खाली झुकलेले डोके, उदास भाव आणि झुकलेले पंख पाहिले. अगदी अरोराने त्याच्या गळ्याभोवती हात टाकले आणि त्याच्या पिसांवरून हात फिरवला, तरी त्याच्या सुंदर निळ्या डोळ्यांतले तेज काही परत येईना. राजवैद्यांनी आकाशात तळपणाऱ्या मध्यरात्रीच्या सूर्याकडे पाहिले आणि मग पक्ष्याकडे पाहिले.

"तो मरतो आहे," राजवैद्य म्हणाले. "त्याचं सगळं आयुष्य आता त्याचं रात्रीच्या आकाशातलं स्वतःच प्रतिबिंब बघण्यावर केंद्रित झालेलं आहे. पण त्याच्या लक्षात आलेलं आहे की तो काही सूर्याशी बरोबरी करू शकत नाही. माफ करा, पण मला नाही वाटत की हा एक दिवसापेक्षा जास्त जगू शकेल."

हे ऐकून अरोरा व्याकुळ झाली. "अरेरे बाबा!" ते रडू लागली. "तुम्ही कृपा करून सूर्यास्त घडवून रात्र परत आणू शकत नाही का? म्हणजे माझा लाडका अग्निपक्षी मरणापासून वाचेल आणि मग आम्ही रात्रीच्या आकाशात पुन्हा सैर करायला जाऊ शकू?"

बोरियस राजाने लगोलग त्याच्या सर्व सल्ल्लागारांना बोलावले.

"माझी मुलगी दुःखात आहे कारण तिचा प्रिय अग्निपक्षी मरत आहे," तो म्हणाला. "आता तो उडतो तेव्हा सूर्याशी बरोबरी करू शकत नाही आणि स्वतःचे प्रतिबिंब पाहू शकत नाही. असा काही उपाय आहे की ज्यामुळे सूर्यास्त त्याच्या निर्धारित वेळेआधी घडवून आणता येईल आणि हा पक्षी मरण्याआधी रात्र परत आणता येईल?"

पुन्हा एकदा त्याच्या सल्लागारांनी त्यांच्या लांब वैचारिक पगड्या घातल्या, विचारमग्न झाले आणि दिवसभर (म्हणजे तुम्हाला आठवत असेल, तिकडे लांब उत्तरेकडे दिवस सहा महिन्यांचा असतो!). पण राजाकडचे उरलेले आईस्क्रिम खाऊन झाले आणि बर्फाच्या वाईनचा शेवटचा घोट घेतला तरी, सूर्यास्त कसा घडवायचा हे काही ते त्याला सांगू शकले नाहीत. मग राजाने बर्फातल्या त्या महान घुबडाला विचारले. त्याने आवाज दिला, "सूर्याला लवकर मावळतीला पाठवायचे! मी अजून तरी तसे घडताना पाहिले नाही!" बर्फातील अस्वल गर्जना करत म्हणाले, "मी घुबडाशी सहमत आहे!" आणि मग युनिकॉर्न व्हेल त्याची शेपटी हलवत म्हणाला, "मी पण त्या दोघांशी सहमत आहे!"

शेवटी, ज्याने राजाला अग्निपक्ष्याबद्दल प्रथम सांगितले होते तो म्हातारा माणूस बोलला.

"हे दयाळू राजा," तो म्हणाला, "मी साता समुद्रापार जाऊन आलेलो आहे, आणि दक्षिणेकडच्या माझ्या एक प्रवासात, मला असा शोध लागला की जगाच्या एका टोकाला जेव्हा प्रकाश असतो, तेव्हा दुसऱ्या टोकाला अंधार असतो, आणि तसेच उलट प्रकारे. जर राजकन्या अरोरा आणि तिचा अग्निपक्षी आत्ता जगाच्या दक्षिण टोकावर असतील, तर तिथे अंधार असेल, आणि रात्रीच्या आकाशात पुन्हा एकदा अग्निपक्षी त्याचे स्वर्गीय प्रतिबिंब पाहू शकेल."

राजाने क्षणभर विचार केला, आणि मग उदास होऊन म्हणाला, "माझा भाऊ, राजा ऑस्टर, जगाच्या टोकाला असणाऱ्या दक्षिणेकडील वाऱ्यावर राज्य करतो, पण मी कधी त्याच्या महालात गेलो नाही, आणि तिथे कसं जायचं हे पण मला माहित नाही."

"मला माहित आहे," त्यांच्या मागून एक बारीकसा, पण तीव्र आवाज आला. सगळ्यांनी आश्चर्याने वळून पाहिले तर एका उघड्या खिडकीमध्ये लाल चोच आणि काळी टोपीवाला एक आर्क्टिक समुद्री पक्षी उभा होता आणि तिथून इतका वेळ सूर्याला परत आणण्याच्या त्यांच्या गप्पा तो ऐकत होता. "मी ऑस्टर राजाच्या राजवाड्यात बऱ्याचदा जाऊन आलो आहे," समुद्री पक्षी म्हणाला. "जेव्हा इथे हिवाळा असतो तेव्हा मी तिकडे उन्हाळा असतो तिथे उडून जातो, आणि आणि जेव्हा तिथे खाली हिवाळा असतो तेव्हा मी इकडे वर उडून येतो. जर मी गेल्यावर तुम्ही माझ्या कुटुंबाची काळजी घेतलीत, तर मी अरोरा राजकन्येला आणि अग्निपक्ष्याला आनंदाने तिथला रस्ता दाखवेन."

"मी स्वतः त्यांची काळजी घेईन!" राजा आनंदाने ओरडला, "जगातील सर्वोत्तम आदरातिथ्य त्यांना मिळेल!"

मग तो म्हाताऱ्याकडे वळला. "तू माझी खूप चांगली सेवा केली आहेस," तो म्हणाला, "त्याबद्दल कृतज्ञता म्हणून, तू वर्षातील कोणतीही एक रात्र माझ्या वाऱ्यावर स्वार होऊ शकतोस, ज्यामुळे तू हवा तितका काळ सर्व लोकांना ज्ञान आणि आनंदाचं वाण देऊ शकशील, जसं तू मला आणि माझ्या कुटुंबाला दिलंस तसंच!"

तर मग, समुद्री पक्ष्याला वाटाड्या म्हणून घेऊन, अरोरा आणि तिच्या अग्निपक्ष्याने ऑस्ट्रेलियाकडे कूच केली, तिकडे दक्षिणेच्या वाऱ्याचे घर होते. विषुववृत्त पार केल्यानंतर, सूर्य अजून अजून खाली बुडत गेला. शेवटी तो क्षितिजाखाली गेला आणि आकाश पुन्हा अंधारले. आपल्या पंखांखालून ज्वाला झगमगत, अग्निपक्षी आणि राजकन्या अरोरा, दक्षिण ध्रुवापलीकडून पुढे समुद्री पक्ष्याच्या मागे जात राहिले. शेवटी, ते दक्षिणेकडील वाऱ्याच्या प्रारंभापर्यंत, ऑस्टर राजाच्या महालापाशी आले. राज्यातील सर्व लोक बाहेर येऊन पहात होते, कारण त्यांनी पूर्ण रात्रभर, उत्तरेकडील आकाशात, अग्निपक्ष्याची प्रभा प्रज्वलित होऊन जवळ जवळ येताना पाहिली होती. त्यांना वाटले की आता काहीतरी मोठे संकट येत आहे, पण जेव्हा अग्निपक्षी राजवाड्याच्या अंगणात उतरला आणि त्यांनी एक सुंदर युवती त्याच्या पाठीवरून उतरताना पाहिली तेव्हा त्यांच्या भीतीचे रूपांतर आनंदात झाले.





ऑस्टर राजाला जेव्हा कळाले की ती राजकन्या अरोरा ही त्याची पुतणी आहे, आणि ती त्याला भेटायला आलेली आहे तेव्हा तर त्याला आनंदाने आकाश ठेंगणे झाले!

"जोवर काळोख आहे तोवरच मी थांबू शकते," तिने त्याला समजावले, "कारण जेव्हा रात्रीच्या आकाशात उडताना अग्निपक्षी त्याचे प्रतिबिंब बघतो तेव्हाच तो खुश असतो. सूर्य उगवला आणि क्षितिजावर आला की लगोलग आम्हाला निघावे लागेल आणि जिकडे अंधार असेल त्या उत्तरेकडे झेप घ्यावी लागेल."

"तुला जितके दिवस राहता येईल तितके दिवस राहा!" ऑस्टर राजा म्हणाला. "स्वर्गाच्या या बाजूला तू आणि तुझ्या अग्निपक्ष्यापेक्षा अधिक सुंदर दुसरे काही नाही. आमच्या लांबलचक ध्रुवीय रात्रीमध्ये तुम्ही तर पहाट आणली आहे!"

आणि मग अरोरा तिचा काका, राजा ऑस्टरबरोबर राहिली. तिने जगाच्या खालच्या भागातील रात्रीचे आकाश दक्षिणेकडील प्रकाशाने उजळून टाकले! आणि शेवटी, जेव्हा सूर्य परत आला, तिने दुःखाने काकाचा आणि त्याच्या माणसांचा निरोप घेतला, आणि उत्तरेकडे तिच्या वडिलांच्या महालाकडे उडून गेली, जिथे सूर्य आधीच मावळला होता.

आणि तेव्हापासून, अरोरा आणि तिचा लाडका अग्निपक्षी दोन साम्राज्यांच्यामध्ये मागे पुढे प्रवास करतात, आणि मोठ्या ध्रुवीय रात्रीकडे पहाट घेऊन येतात!

*********

म्हाताऱ्या माणसाने मला उचलून घेतले आणि डोंगरउतारावर पाठुंगळीला घेऊन तो मला माझ्या घरी घेऊन आला, "तर ही ती गोष्ट की कसे उत्तरेकडील आणि दक्षिणेकडील प्रकाश तयार झाले!"

"तुमच्या मर्जीप्रमाणे तुम्ही अरोरा आणि अग्निपक्ष्याला कसं काय खाली बोलावता?" मी उत्सुकतेने आणि कुतूहलाने विचारले.

तो माझ्या शयनगृहाच्या खिडकीतून खाली झुकला आणि त्याने मला माझ्या पलंगावर ठेवले. "हे बघ ते मात्र," तोंडावर बोट ठेवत तो म्हणाला, "गुपित आहे! पण जर का तू मला वचन दिलंस की तू पुन्हा कधीही घरातून पळून जाणार नाहीस, तर मी ते तुला सांगेन. आज रात्री जर मी वाऱ्यावर सैर करत माझ्या भेटवस्तू आणल्या नसत्या, तर कदाचित मला तू त्या झाडाखाली झोपलेला दिसताही नसतास."

मी वचन दिले. आणि त्यानंतर, तो खाली वाकला आणि माझ्या अंगावर पांघरूण घालता घालता त्याने हळूच त्याचे गुपित माझ्या कानात कुजबुजत सांगितले. मला त्याला विचारायचे होते की तो कोण होता आणि कुठे रहात होता, पण मला खूप झोप आली होती आणि डोंगर चढून मी जाम दमलो होतो, आणि त्यामुळे तो कधी गेला किंवा कधी खिडकी बंद केली ते मला आठवतच नाही.

म्हाताऱ्या माणसाने सांगितलेल्या गोष्टीतला प्रत्येक शब्द आठवत असतानाच, मला जाग आली तेव्हा अजूनही खूप अंधार होता. कधी एकदा सकाळ होते आणि मी सगळ्यांना अरोरा आणि तिचा अग्निपक्षी म्हणजे माझी त्यांच्यासाठीची नाताळची भेट असल्याचे सांगतो असे मला झाले होते! मी उठून बसलो आणि मला झोपवल्यावर तो कोणत्या मार्गाने गेला असेल ते पाहण्यासाठी मी खिडकी उघडली. पण चांदण्या प्रकाशात मला माझ्या स्वतःच्याच पाऊलखुणा दिसल्या आणि त्या तर माझ्या खिडकीपासून दूर जाणाऱ्या दिसत होत्या.

आणि मग माझ्या लक्षात आले की मी स्वप्न पहात होतो! ती गोष्ट खरी नव्हतीच! असा कुठलाच अग्निपक्षी किंवा त्याच्या पाठीवर स्वार होणारी राजकन्या नव्हती! मला पुन्हा एकदा रडू आले कारण पुन्हा एकदा माझ्याकडे नाताळला द्यायला काहीही नव्हते! पण वर त्या अंधाऱ्या आकाशात बघत तिथे बसल्यावर, फिकटसर हिरव्या रंगाची नभप्रभा हळुवार हलताना जेव्हा मला दिसली, तेव्हा अचानक मला त्या म्हाताऱ्या माणसाने मला पलंगावर ठेऊन पांघरूण घालताना कुजबुजत सांगितलेले गुपित आठवले:

घातली तुम्ही शीळ जर थंड चांदण्या रात्री,

आकाश प्रज्वलित होते जेव्हा लाल, हिरव्या, निळया रंगांनी,

उतरतील ते जमिनीवर सळसळ आवाजात खाली,

आणि करतील ना ते तुमची एक इच्छापूर्ती!

मी शीळ घातली, अरोरा आणि तिचा अग्निपक्षी रात्रीच्या आकाशात सैर करत असतील या विचाराने आधी हळू वाजवली, आणि मग जरा जोरात वाजवली. अचानक पर्वतशिखरांवर नृत्य करणाऱ्या ज्वालेने रात्र प्रज्वलित झाली आणि तिने माझ्यासमोरील आकाश आणि जंगल व्यापून टाकले. अगदी त्या म्हाताऱ्या माणसासमोर झाले होते तसेच! मला माझ्यासमोरील आकाशात पंख फडफडल्याचा आवाज आला, आणि या वेळी जेव्हा मी वर पाहिले तेव्हा मला खात्री होती की नक्की एक मोठा पक्षी उडत जाताना दिसेल!



माझ्या शयनगृहाच्या खिडकीच्या बाहेर बर्फावर झगमगत नृत्य करणाऱ्या प्रकाशाकडे मी टक लावून पाहिले, केवळ एकच जाणून घेण्याच्या इच्छेने की तो म्हातारा माणूस कोण होता!

आणि ऐकले त्याचे नाव मी, कानात कुजबुजले कोणी

मग प्रज्वलित ती नभप्रभा गेली हळूच विरुनी

समाप्त

# लेखकाविषयी



रिचर्ड टी. पार हे निवृत्त प्राध्यापक असून अमेरिकेतील पॅसिफिक नॉर्थवेस्ट भागात राहतात. त्यांनी चार कादंबऱ्या आणि खूप लघुकथा लिहिल्या आहेत. ओरेगॉन विद्यापीठातून इंग्रजीमध्ये डॉक्टर ऑफ आर्टस् पदवी प्राप्त केल्यानंतर त्यांनी अमेरिका, ट्रॉम्सो, नॉर्वे येथील विद्यापीठांत आणि युरोपिअन सेंटर फॉर नॉर्दन लाईट रिसर्चमध्ये शिकवले आहे. ते ओम्सविल, ओरेगॉनच्या बाहेर विलामेट व्हॅलीमधील त्यांच्या छोट्या शेतात राहतात.

ई-मेल: rtparr@wavecable.com

# चित्रकाराविषयी



एन्डरे लोथे एक आर्मी ऑफिसर आहेत आणि ऑस्लोमधील नॉर्वेजियन मिलिटरी अकॅडमीचे स्नातक आहेत. ते नॉर्वेतील आर्क्टिक सर्कलच्या वरच्या छोट्या गावात, ओवसाडबिर्ग इथे राहतात. गेल्या बारा वर्षांत, त्यांनी अध्ययन आणि रिकाम्या वेळात कलाकार-निसर्गवादी आणि चित्रकार म्हणून काम केले आहे.

ई-मेल: endrelot@hotmail.com

## आभार

लेखक, या पुस्तकाच्या डिझाइन आणि लेआऊटसाठी स्किपींग स्टोन्स: ए मल्टीकल्चरल लिटररी मॅगेझीनचे कार्यकारी संपादक, श्री अरुण नारायण टोके यांचे मनःपूर्वक आभार मानू इच्छितात.

## रिचर्ड टी. पार यांची अन्य पुस्तके

अँड्रोमेडा रायझिंग (भाग १)

अँड्रोमेडा रायझिंग (भाग २)

विनस मिरर

द फ्लेवर ऑफ पीचेस (मूळ, द लास्ट डॉगफाईट)

द बिटररूट अफेअर

एका लहान मुलाला शोध लागतो की दर नाताळला सांगितल्यानुसार खरे तर सांता क्लॉज अस्तित्वात नसतो. आपल्याकडे सर्वांसाठी भेटवस्तू द्यायला काही नाही याची जाणीव झाल्यावर तो त्याच्या शयनगृहाच्या खिडकीतून उडी मारून पळून जातो. गोठवणाऱ्या थंडीत दमून तो एका झाडाखाली झोपी जातो. एक म्हातारा माणूस त्याला हलवून उठवतो आणि विचारतो की तो सांता क्लॉजची वाट पाहत घरी पलंगावर का थांबला नाही. तो मुलगा त्याला सांगतो की सांता क्लॉज काही नसतो, आणि त्याच्याकडे कोणालाही द्यायला भेटवस्तू नसल्याने तो पळून जात आहे. म्हातारा माणूस त्याला एक अद्भुत गोष्ट सांगून दिलासा देतो. नाताळच्या सकाळी ती अदभूत गोष्ट पुन्हा सांगून तीच भेट म्हणून प्रत्येकाला देऊ शकतो असेही सांगतो. तो त्या मुलाला पुन्हा त्याच्या खोलीत घेऊन जातो आणि निरोपाची भेट म्हणून त्याला शीळ घालून उत्तरेकडील प्रकाश कसा बोलवायचा आणि एक इच्छा कशी पूर्ण करायची ते सांगतो.

